**"पानिपत" या हिंदी चित्रपटाच्या तिकीट दरावर लागू असलेल्या राज्य वस्तू व सेवा कराचा (एसजीएसटी) परतावा देणे संबंधात.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- संकिर्ण ११२०/प्र.क्र.१/कराधान-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०८ जानेवारी, २०२०

**प्रस्तावना :**

**"पानिपत"** हा हिंदी चित्रपट मराठा साम्राज्यातील तत्कालीन पेशवे व अहमद शहा अब्दाली यांच्यातील पानिपत येथील तिसऱ्या युध्दावर आधारित आहे. १८ व्या शतकात मराठा साम्राज्यशाही ही आपल्या सर्वोच्च शिखरावर होती. अशा परिस्थितीत पानिपत येथील तिसऱ्या युध्दात मराठा पेशव्यातर्फे सदाशिवराव भाऊ यांनी युध्दाचे नेतृत्व केले व अहमद शहा अब्दाली यांच्याविरुध्द अतुलनिय साहस व पराक्रम दाखविले. सदरच्या युध्दात मराठ्यांची अपरिमीत हानी झाली. हे युध्द मराठा पेशव्यांनी जरी हरले, तरी त्यांनी युध्दामध्ये दाखविलेले साहस व पराक्रम इतिहासामध्ये सुवर्ण हस्ताक्षरांनी लिहले गेले. अशा प्रकारे महाराष्ट्राच्या वैभवशील इतिहासावर अधारलेला चित्रपट महाराष्ट्राच्या सर्व जनतेने पाहणे आवश्यक आहे.

**शासन निर्णय :**

शासनाने राज्यातील चित्रपटगृहातील **"पानिपत"** या हिंदी चित्रपटाच्या तिकिटाच्या रक्कमेवर आकारला जाणाऱ्या राज्य वस्तू व सेवाकराच्या (एसजीएसटी) समतूल्य रक्कमेची प्रतिपूर्ती करण्याचा निर्णय घेतलेला आहे व त्यासाठी खालील अटी लागू असतील.

१. नोंदणीकृत चित्रपटगृहांनी राज्य शासनाने निर्देशित केलेल्या अवधीमध्ये प्रदर्शित होणाऱ्या उपरोक्त चित्रपटाच्या तिकिटावरील राज्य वस्तू व सेवाकराच्या (एसजीएसटी) समतूल्य रक्कम तिकीटाच्या एकूण किंमतीतून कमी करुन तिकिटाची विक्री प्रेक्षकांना करावी. असे असले तरी, नोंदणीकृत चित्रपटागृहांनी तिकिटाच्या किंमतीवरील राज्य वस्तू व सेवा कराची (एसजीएसटी) रक्कम प्रेक्षकांकडून वसूल न करता स्वत: शासकीय तिजोरीत नेहमीप्रमाणे भरणे आवश्यक आहे.

२. चित्रपटाच्या प्रदर्शनासाठी संबंधित चित्रपटगृहातील प्रवेश शुल्कामध्ये वृध्दी करण्यात येणार नाही. तसेच विविध वर्गाच्या आसन क्षमतेमध्ये परिवर्तन करता येणार नाही.

३. नोंदणीकृत चित्रपटागृहांनी प्रेक्षकांकडून अगोदरच राज्य वस्तू व सेवा कराची रक्कम वसूल केली असेल तर त्याची प्रतिपुर्ती करण्यात येणार नाही. तसेच चित्रपटगृहाने शासन निर्णय निर्गमित झाल्यावर राज्य वस्तू व सेवा कराची (एसजीएसटी) रक्कम वसूल केली असेल तर त्याची प्रतिपुर्ती देखील करण्यात येणार नाही.

४. वस्तू व सेवा कर कायद्यांतर्गत विहित विवरण दाखल करुन देय कराचा भरणा केल्यानंतर चित्रपटगृह चालकांना देय राज्य वस्तू व सेवा कराच्या परताव्यासाठी अर्ज करता येईल.

५. चित्रपटगृहांनी देय राज्य वस्तू व सेवा कराच्या (एसजीएसटी) रक्कमेचा परतावा, त्यांनी विहित नमुन्यात अर्ज केल्यापासून ३० दिवसाच्या आत देण्यात येईल.

६. राज्यकर आयुक्त, वस्तू व सेवा कर विभाग यांचेकडून संबंधित प्रतिपूर्तीसाठी आवेदनाची पध्दती व प्रक्रिया यासंबंधी वेगळे दिशानिर्देश यथावकाश प्रसिध्द केले जातील.

७. सदर शासन निर्णय निर्गमित झाल्यापासून, राज्य वस्तू व सेवा कराचा (एसजीएसटी) परतावा सवलत चित्रपटगृहांना लागू होईल. सदर सवलत दि. ३० एप्रिल, २०२० पर्यंतच्या कालावधीकरीता लागू राहील.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२००१०८१२२८३२८००५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Manoj Saunik



**( मनोज सौनिक )**
शासनाचे अपर मुख्य सचिव

**प्रत:**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (वित्त) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४. मा. राज्यमंत्री (वित्त) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५. वित्त विभाग, (व्यय-३ व अर्थोपाय कार्यासन), मंत्रालय, मुंबई
६. राज्यकर आयुक्त, वस्तू व सेवाकर विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा व अनुज्ञेयता)/ लेखा परीक्षा, मुंबई
८. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा व अनुज्ञेयता)/ लेखा परीक्षा, नागपूर
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०. निवडनस्ती.